**बागायती रोपमळयांचे बळकटीकरण करणे ही राज्य पुरस्कृत योजना सन २०१०-११ मध्ये राबविणे- निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन ,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र. रोवाब-४०१०/ प्र.क्र.७०/१३ अे**
**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-३२,**
**दिनांक : २५ जून, २०१०.**

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांकः अंदाज २०.१०/प्र.क्र. ७१/२०१०/ अर्थसंकल्प-३, दि. १८/५/२०१०

२) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्रमांक - अंदाज-कॅश फ्लो-२०१०/प्र.क्र. ५९/१० /२-अे, दि. २१/५/२०१०

**प्रस्तावना :-**

राज्यात राबविण्यात येत असलेल्या रोजगार हमी योजनेशी निगडीत फळबाग लागवड कार्यक्रमांतर्गत मुख्यत्वे शासकीय फळरोवाटिकेवरील कलमे / झाडे लाभार्थ्यांना पुरविण्यात येतात. तसेच शासकीय रोपवाटिकेवरील कलमे/रोपे यांना बीजोत्पादन कार्यक्रमांतर्गतसुध्दा राज्यात मोठया प्रमाणावर मागणी आहे. या व्यतिरिक्त शेतक-यांना उत्कृष्ट वाणांच्या लागवड साहित्यांचा पुरवठा करणे, उच्चतंत्रज्ञानाची प्रात्यक्षिक प्रक्षेत्रे विकसित करणे, रोपवाटिकेवरील कर्मचा-यांना प्रशिक्षण देणे, इत्यादी अनेक बाबींकरिता शासकीय रोपवाटिकांचे बळकटीकरण करणे आवश्यक आहे.

**शासन निर्णय-**

शासकीय रोपवाटिकेवरील कलमे/रोपे उत्पादन व इतर माध्यमातून उत्पन्न मिळते. रोपवाटिकाची आर्थिक स्थिती सुधारण्याकरिता उपाययोजना अवलंबण्यात येत असून उत्पादनात वाढ होत आहे. राष्ट्रीय फलोत्पादन अभियान कार्यक्रमासाठी फळपिकाची कलमे/रोपे, भाजीपाला व फुलपिकांची रोपे यासाठी मोठा वाव असल्याने रोपवाटिकासाठी नियमित अनुदान उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. यामुळे सदर योजना राबविण्यास प्रशासकीय मान्यता देणे आणि सन २०१०-११ मध्ये शासकीय रोपवाटिकेचे बळकटीकरण करणे या राज्यस्तरीय योजनेसाठी रु. ३८०.०० लक्ष इतका निधी मंजूर करण्यात आला आहे. त्यापैकी रु.१९०.०० लक्ष निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**२.** सदर योजनेकरिता रु. १९०.०० लक्ष (रु.एकशे नव्वद लक्ष फक्त) एवढा निधी खालील लेखाशीर्षातील सन २०१०-२०११ करिता मंजूर केलेल्या तरतूदींतून भागविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

मागणी क्रमांक डी -३
२४०१ - पीक संवर्धन,
११९ - बागायती व भाजीपाला पिके,
११९ - (०३) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना
११९ - (०३ ) (०३ ) बागायती रोपमळयांची स्थापना व बळकटीकरण (२४०१ १७४२)

**कृ.मा.प.**

**३.** या योजनेसाठी मंजूर केलेला निधी खर्च करण्यास व त्याचे जिल्हानिहाय वितरण करण्यास **आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी** म्हणून घोषित करण्यात येत आहे. आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी या योजनेच्या अंमलबजावणीसंबधी मार्गदर्शक सूचना संबंधितांना निर्गमित कराव्यात.

**४.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १८ मे,२०१० चे परिपत्रक व प्रधान सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

**५ .** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेताक (२०१००६२५१९४८४५००१ ) असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**(हे. द. भांगले )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन,**

प्रति,

आयुक्त कृषी, महाराष्ट्र राज्य,पुणे. (५ प्रती)

संचालक फलोत्पादन, कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे, (५ प्रती)

सर्व संचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे,

सर्व विभागीय कृषी सहसंचालक,

सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,

महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा ) मुंबई /नागपूर,

वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे.

संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई ( २ प्रती)

सहसंचालक लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई -३२,

माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.

नियोजन विभाग,(कार्यासन -१४३२ ) मंत्रालय,मुंबई. / वित्त विभाग (व्यय-१ /अर्थसंकल्प -३/१२)

सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, कृषि व पदुम (कृषि व फलोत्पादन) विभाग, मंत्रालय,मुंबई.

निवडनस्ती